स्वर्गीय श्री.बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक सार्वजनिक न्यासावरील अध्यक्ष व इतर पदावर नियुक्तीबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:-स्मारक ३११४/मुमंस-१४०/प्र.क्र.३७५/२९,
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १३ मार्च, २०२०

<u>वाचा</u> :- (१) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र. स्मारक ३११४/मुमंस१४०/प्र.क्र.३७५, दि.४ डिसेंबर, २०१४ व दि.२७ सप्टेंबर, २०१६.
(२) श्री. उध्दव ठाकरे, अध्यक्ष, स्वर्गीय श्री. बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक सार्वजनिक न्यास यांचे दि.२५.११.२०१९ चे पत्र.
(३) मा.मंत्री (उद्योग) तथा सदस्य सचिव, स्वर्गीय श्री. बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक सार्वजनिक न्यास यांचे दि.२८.०२.२०२० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

स्व.बाळासाहेब ठाकरे यांच्या स्मृती जपण्याकरीता मुंबई येथे त्यांचे भव्य स्मारक उभारण्यासाठी शिवाजी पार्क,दादर येथील “महापौर बंगला” या जागेची निवड केली आहे. सदर स्मारकासाठी शासकीय सार्वजनिक न्यास स्थापन करण्यात आला आहे. त्यानुसार दि.२७ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये श्री. उध्दव ठाकरे यांच्या अध्यक्षतेखाली सार्वजनिक न्यास व संस्था स्थापन करण्यात आलेली होती. दि.२५.११.२०१९ च्या पत्रान्वये श्री. उध्दव ठाकरे, अध्यक्ष, स्वर्गीय श्री. बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक सार्वजनिक न्यास यांनी अध्यक्ष पदाचा राजीनामा दिल्याने सदर न्यासावरील अध्यक्ष पद रिक्त झाले आहे. तसेच न्यासाच्या विधानपत्र (Memorandum of Association) व नियम व नियमावली (Rules And Regulation) मधील अ.क्र. १४ येथील तरतूदीनुसार न्यासावरील अध्यक्ष व इतर सदस्यांचा प्रथम नियुक्तीचा ३ वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने पदसिध्द सदस्य वगळता अध्यक्ष व सदस्यांची पदे भरण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आता स्व.बाळासाहेब ठाकरे यांचे स्मारक उभारण्याच्या प्रयोजनार्थ दि.२७ सप्टेंबर, २०१६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या प्रथम विश्वस्त मंडळ (Board of Governance/Trustees) असलेला शासकीय सार्वजनिक न्यास व संस्थेचे अध्यक्ष श्री. उध्दव ठाकरे यांनी दि.२५.११.२०१९ च्या पत्रान्वये दिलेल्या राजीनाम्यामुळे रिक्त झालेल्या अध्यक्ष पदावर व सदस्य पदावर खालीलप्रमाणे नव्याने नियुक्ती करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नाव/पदनाम | न्यासावरील पद |
|---|---|---|
| १ | श्री.आदित्य ठाकरे | अध्यक्ष |
| २ | श्री.सुभाष राजाराम देसाई | सदस्य सचिव |
| ३ | श्री शशीकांत श्रीरंग प्रभु | सदस्य |
| ४ | रिक्त | सदस्य |
| ५ | रिक्त | सदस्य |
| ६ | मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन | पदसिध्द सदस्य |
| ७ | प्रधान सचिव (नगर विकास)(नवि-२) | पदसिध्द सदस्य |
| ८ | प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग) | पदसिध्द सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ९ | आयुक्त,बृहन्मुंबई महानगरपालिका | पदसिध्द सदस्य |
| १० | रिक्त (सर्वसाधारण सदस्यांमधून निवडावयाचे) | सदस्य |
| ११ | रिक्त (सर्वसाधारण सदस्यांमधून निवडावयाचे) | सदस्य |

सदर सदस्यांची मुदत ५ वर्ष कालावधीकरीता राहील.

उपरोक्त अध्यक्ष व सदस्यांच्या नियुक्तीमुळे झालेल्या बदलाच्या अनुषंगाने सार्वजनिक न्यासाचा व संस्थेचा नोंदणी अर्ज धर्मदाय आयुक्त यांचेकडे दाखल करण्यास श्री.सुभाष राजाराम देसाई,मा.मंत्री (उद्योग) तथा सदस्य सचिव, शासकीय सार्वजनिक न्यास यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्या अनुषंगाने श्री.सुभाष राजाराम देसाई, मा.मंत्री, यांनी **"बाळासाहेब ठाकरे राष्ट्रीय स्मारक"** या नावाने सार्वजनिक न्यासाची मुंबई सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १९५० व संस्थेची सहकारी संस्था नोंदणी अधिनियम,१९६० अन्वये केलेल्या नोंदणीच्या अनुषंगाने आता झालेल्या अध्यक्ष व इतर पदावरील झालेल्या बदलाबाबतच्या नोंदणी संदर्भात पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

उपरोक्त नियुक्त करण्यात आलेल्या विश्वस्त मंडळाने न्यासाच्या विधानपत्र (Memorandum of Association) व नियम व नियमावली (Rules and Regulations) यातील तरतूदीस अनुसरुन न्यासाचे कामकाज करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३१८३३०९६८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by VALVI JANA JIVA
Date: 2020.03.13 18:36:50 +05'30'

(ज. जि. वळवी)
उप सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
३. मा.मंत्री (उद्योग),मंत्रालय,मुंबई,
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई
५. अपर मुख्य सचिव (नवि-१),नगर विकास विभाग,
६. प्रधान सचिव (नवि-२),नगर विकास विभाग,
७. प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग)
८. सचिव (प्र.सु.व र.व का.),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
९. विभागीय आयुक्त,कोकण विभाग,कोकण भवन,नवी मुंबई,
१०. आयुक्त,बृहन्मुंबई महानगरपालिका,मुंबई
११. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई,
१२. उप सचिव,कार्यासन-२९,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३. निवडनस्ती/कार्यासन-२९